राज्यातील अल्पसंख्याक बहुल नागरी क्षेत्रात क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत नांदुरा नगर परिषदेला विकासकामासाठी विशेष बाब म्हणून अनुदान वितरित करण्यास मंजुरी देण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्यांक विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : क्षेविका-२०१५/प्र.क्र.३८/का.९**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २७ मार्च, २०१५.

**संदर्भ :-** १) शासन निर्णय,अल्पसंख्याक विकास विभाग, क्षेविका-२०१४/प्र.क्र.५२/का.७, दि. २१ जून, २०१४.
२) शासन निर्णय,अल्पसंख्याक विकास विभाग, क्षेविका-२०१४/प्र.क्र.१०१/का.९, दि. २३ जानेवारी, २०१५.
३) शासन निर्णय,अल्पसंख्याक विकास विभाग, क्षेविका-२०१५/प्र.क्र.३७/का.९, दि. २७ मार्च, २०१५.
४) जिल्हाधिकारी, बुलढाणा यांचे क्र. कावि/अका/अल्पसंख्याक कक्ष/२९८/२०१५, दि.२३ फेब्रुवारी, २०१५ चे पत्र

**शासन निर्णय :-**

अल्पसंख्याक विकास विभागाने सन २००८-०९ या वर्षापासून राज्यातील अल्पसंख्याक बहुल नागरी क्षेत्रांकरिता क्षेत्रविकास कार्यक्रम कार्यान्वित केला असून संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये ही योजना सन २०१४-१५ या वर्षात राबविण्यास मंजुरी देण्यात आली आहे.

२. संदर्भ क्र.४ पत्रान्वये जिल्हाधिकारी, बुलढाणा यांच्याकडून नांदुरा नगरपरिषदेच्या हद्दीमध्ये गैबीनगर नावाची अल्पसंख्याक लोकांची वस्ती असल्याचे तसेच सदर वस्तीला जाण्यासाठी कोणताही मुख्य मार्ग नसल्याने सदर वस्तीला जड वाहतूक किंवा कोणतेही चारचाकी मोठे वाहन नेण्याची सुविधा नसल्याने उपरोक्त नगरपरिषदेच्या हद्दीत १ नॅशनल हायवेवरील डांगा पेट्रोलपंपा पासून ते गैबीनगर ते रामदेवबाबानगर पर्यंत रस्ता बांधकाम करणे व डांबरीकरण करणे यासाठी रू. ६०,२८,०००/-(अक्षरी रू. साठ लक्ष अठ्ठावीस हजार फक्त ) एवढ्या रकमेचा प्रस्ताव शासनास मान्यतेसाठी सादर केला होता. त्या अनुषंगाने नागरी क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत विशेष बाब म्हणून सदर प्रस्तावास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

३. क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत सन २०१४-१५ या वर्षात संदर्भ क्र. २ व ३ अन्वये संबंधित जिल्ह्यातील महानगरपालिका/नगरपालिका/नगर पंचायती यांना रू. ४,३६,६२,१२५/- (अक्षरी रू. चार कोटी छत्तीस लक्ष बासष्ठ हजार एकशे पंचवीस फक्त ) एवढे अनुदान वितरित करण्यात आले आहे. या योजनेसाठी सन २०१४-१५ वर्षामध्ये अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतूदीमधून शिल्लक असलेल्या उर्वरित अनुदानामधून नांदुरा नगरपरिषदेमधील हद्दीत १ नॅशनल हायवेवरील डांगा पेट्रोलपंपा पासून ते गैबीनगर ते रामदेवबाबानगर पर्यंत रस्ता बांधकाम करणे व डांबरीकरण करणे यासाठी रू. ६०,२८,०००/-(अक्षरी रू. साठ लक्ष अठ्ठावीस हजार फक्त ) एवढ्या रकमेच्या प्रस्तावास विशेष बाब प्रशासकीय व वित्तीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. हे अनुदान जिल्हाधिकारी, बुलढाणा यांच्या स्वाधीन करण्यात येत आहे. जिल्हाधिकारी यांनी नांदुरा नगर परिषदेकडून सविस्तर अंदाजपत्रक व आवश्यक त्या बाबींची पूर्तता केल्याची तपासणी करून प्रस्तावाला प्रशासकीय मान्यता प्रदान करावी. त्यानंतरच निधी नांदुरा नगर परिषदेकडे स्वाधिन करावा.

४. जिल्हाधिकारी, बुलढाणा हे उपरोक्त विकासकामासाठी नियंत्रक अधिकारी आणि आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील.

५. नांदुरा नगर परिषदेने मागणी केल्यानुसार ज्या विवक्षित प्रयोजनासाठी विशेष बाब म्हणून निधी मंजूर करण्यात आला आहे, केवळ त्याच प्रयोजनासाठी निधी खर्ची टाकणे अनिवार्य आहे. जिल्हाधिकारी, बुलढाणा यांच्याकडून अनुदान वितरित करण्यात आल्यानंतर नांदुरा नगर परिषदेकडून सहा महिन्यांच्या कालावधीत प्रस्तावात नमूद केलेली कामे पूर्ण करणे आवश्यक आहे व याबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे या शासन निर्णयाच्या परिशिष्ट "अ" मध्ये विहित केलेल्या नमुन्यात अल्पसंख्याक विकास विभागाकडे सादर करणे आवश्यक आहे. क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत नांदुरा नगर परिषदेने हाती घेतलेल्या विकासकामांच्या प्रगतीबाबत संनियंत्रण करुन त्याबाबतचा अहवाल जिल्हाधिकारी, बुलढाणा यांनी शासनास सादर करावा.

६. या योजनेंतर्गत होणारा खर्च " मागणी क्र. झेडई-१ ए, मुख्यलेखाशिर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०७) अल्पसंख्याक सकेंद्रित क्षेत्रातील क्षेत्र विकास कार्यक्रमाकरिता सहायक अनुदान (२२३५-ए-१३१) ३१ सहायक अनुदान" या लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ या वर्षाकरिता मंजुर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

७. हे आदेश नियोजन विभागाच्या अनौचारिक संदर्भ क्रमांक- १५७/१४७५, दि. ११/०३/२०१५ तसेच वित्त विभागाच्या अनौचारिक संदर्भ क्रमांक- २५८/१५/व्यय-४, दि.१७/०३/२०१५ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१५०३३०१२११०५७०१४ असा आहे.हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

GANGURDE SANJAY SURYAKANT

Digitally signed by GANGURDE SANJAY SURYAKANT
DN: CN = GANGURDE SANJAY SURYAKANT, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = MINORITIES DEVELOPMENT,CID - 919995
Date: 2015.03.30 12:21:07 +05'30'

**(सं.सु.गांगुर्डे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
४) अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव सर्व मंत्रालयीन विभाग,
५) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
६) महालेखापाल १/२ (लेखापरीक्षा) , मुंबई / नागपूर,
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
८) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
९) संबंधित विभागीय आयुक्त,
१०) आयुक्त, नगरपालिका प्रशासन, मुंबई,
११) संबंधित जिल्हाधिकारी,
१२) आयुक्त, संबंधित महानगरपालिका,
१३) मुख्याधिकारी, संबंधित नगरपालिका,
१४) मा.मंत्री / मा.राज्यमंत्री (अल्पसंख्याक विकास) यांचे खाजगी सचिव,
१५) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
*१६)* महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय (प्रसिध्दीसाठी),
१७) निवडनस्ती,

**शासन निर्णय,अल्पसंख्याक विकास विभाग क्र.क्षेविका-२०१५/प्र.क्र.३८/का.९, दि. २७ मार्च, २०१५.**

## परिशिष्ट - "अ"

## उपयोगिता प्रमाणपत्र

प्रमाणित करण्यात येते की, अल्पसंख्याक विकास विभागाने राज्यातील अल्पसंख्याक बहुल नागरी क्षेत्रांसाठी कार्यान्वित केलेल्या क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. क्षेविका-२०१५/प्र.क्र.३८/का-९, दि. २७ मार्च, २०१५ अन्वये वितरित केलेला रु.
(अक्षरी रु. ) एवढा निधी पुढील विकासकामांसाठी उपयोगात आणला आहे :-

| विकासकाम/ विकासकामे | वापरलेली रक्कम |
|---|---|
| अ. | रु. |
| ब. | रु. |
| क. | रु. |
| ड. | रु. |

असेही प्रमाणित करण्यात येते की, क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत ज्या निकष / अटींनुसार शासनाने अनुदान मंजूर केले होते, त्या निकष/ अटींची यथायोग्यरित्या पुर्तता करण्यात आली आहे. तसेच ज्या प्रयोजनाकरिता निधी मंजूर करण्यात आला होता, त्याच प्रयोजनाकरिता निधीचा प्रत्यक्षात विनियोग झाला आहे, याची खातरजमा करण्याकरिता मी खालील दस्तऐवज/अभिलेखांची तपासणी केली आहे :-

तपासणी केलेल्या दस्तऐवज/अभिलेखांचे प्रकार :-

१. प्रमाणक आणि पुस्तक लेखा (Vouchers and Book of Accounts)
२. मोजणी पुस्तके (Measurement Books)
३. सहायक अनुदान / कर्ज नोंदवही (Grant-in-aid/ Loan Register)
४. खर्च नोंदवही (Expenditure Register)

| आयुक्त, महानगरपालिका/ मुख्याधिकारी, नगरपालिका यांची स्वाक्षरी | संबंधित महानगरपालिका / नगरपालिका ज्या जिल्हयात स्थित आहेत त्या जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांची प्रतिस्वाक्षरी |
|---|---|
| नाव<br>तारीख<br>स्थळ<br>कार्यालय मुद्रा | नाव<br>तारीख<br>स्थळ<br>कार्यालय मुद्रा |

***